**एसईबीसी आणि ईडब्ल्युएस आरक्षण लागू केल्यामुळे बाधित झालेल्या वैद्यकीय व दंत पदवी/ पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या खुल्या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्काची प्रतिपुर्ती करण्याबाबत....**

# महाराष्ट्र शासन

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - एमईडी १०१९/प्र.क्र.२९१/१९/शिक्षण-२**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.

**दिनांक :-** ०९ ऑक्टोंबर, २०२०.

**वाचा :**

१. शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २०.०९.२०१९
२. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन पत्र क्र. एमईडी-१०१८/ प्र.क्र.४२३/ १८/ शिक्षण-२, दिनांक ०८.०३.२०१९.
३. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र. एमईडी-१०१९/ प्र.क्र.३७/ १९/ शिक्षण-२, दिनांक ०७.०३.२०१९
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. राआधो-४०१९/ प्र.क्र.३१/ १६-अ, दिनांक१२.०२.२०१९.
५. महाराष्ट्र राज्यातील सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागास (एसईबीसी) वर्गाकरीता (राज्यातील शैक्षणिक संस्थांमधील प्रवेशाकरीता जागांचे आणि राज्याच्या नियंत्रणाखालील लोकसेवांमधील नियुक्त्यांचे आणि पदांचे) आरक्षण अधिनियम, २०१८ (२०१९ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.१३ यासह).

**प्रस्तावना :**

राज्यातील "सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागास (SEBC) वर्गाकरीता" राज्यातील शैक्षणिक संस्थांमधील प्रवेशासाठी आणि राज्याच्या नियंत्रणाखालील लोकसेवांमधील नियुक्त्यांमध्ये संदर्भाधीन अधिनियम/ अध्यादेश याद्वारे आरक्षण विहीत करण्यात आले आहे. त्यानुषंगाने, संदर्भाधीन क्रमांक २ वरील पत्रान्वये सदर आरक्षण आरोग्य विज्ञान अभ्यासक्रमांच्या प्रवेशांकरीता लागू करण्यात आले आहे.

२. राज्यातील खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील (EWS) विद्यार्थ्यांना (अल्पसंख्यांक दर्जाप्राप्त शैक्षणिक संस्था वगळून) शैक्षणिक संस्था/ अनुदानित विद्यालये, महाविद्यालये, सर्व उच्च शिक्षण देणाऱ्या संस्था यामध्ये एकुण प्रवेश द्यावयाच्या जागांमध्ये १० टक्के आरक्षण सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ४ वरील शासन निर्णयान्वये लागू करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन संदर्भाधीन क्रमांक ३ वरील शासन निर्णयान्वये आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांसाठी राज्यातील आरोग्य विज्ञानाच्या शासकीय/

महापालिका/ शासन अनुदानित/ खाजगी विना अनुदानित महाविद्यालये (अल्पसंख्यांक शैक्षणिक संस्था वगळून) यामध्ये प्रवेश द्यावयाच्या जागांमध्ये १० टक्के आरक्षण विहीत करण्यात आले आहे.

३. सन २०१९-२० या शैक्षणिक वर्षी उक्त एसईबीसी आणि ईडब्ल्युएस आरक्षण लागू केल्यामुळे खुल्या प्रवर्गातील काही गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांचे वैद्यकीय व दंत अभ्यासक्रमाचे प्रवेश बाधित होऊन त्यांना शासकीय महाविद्यालयाऐवजी खाजगी विनाअनुदानित महाविद्यालयात प्रवेश घ्यावे लागले होते. सन २०१९-२० या शैक्षणिक वर्षी अशा बाधीत झालेल्या वैद्यकीय व दंत अभ्यासक्रमांच्या खुल्या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना त्यांच्या संबंधित अभ्यासक्रमाचे शैक्षणिक शुल्काचा शासनामार्फत भरणा करण्यास “एक विशेष बाब” व “फक्त एकवेळेचीच बाब” म्हणून संदर्भाधीन शासननिर्णय क्रमांक १ अन्वये तत्वत: मान्यता देण्यात आली होती. सदर शासन निर्णयास दिनांक १२/०८/२०२० रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत कार्योत्तर मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने, तसेच उपरोक्त बाधित विद्यार्थ्यांना करावयाची शैक्षणिक शुल्काची प्रतिपुर्ती यासंदर्भात पात्रतेसाठीचे निकष व कार्यपध्दती याबाबत स्वतंत्रपणे सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

एसईबीसी आणि ईडब्ल्युएस आरक्षण लागू झाल्यामुळे सन २०१९-२० या शैक्षणिक वर्षी बाधित झालेल्या वैद्यकीय व दंत अभ्यासक्रमाच्या खुल्या प्रवर्गातील गुणवत्ताप्राप्त विद्यार्थ्यांना त्यांच्या संबंधीत अभ्यासक्रमांकरीता सक्षम प्राधिकरणाने विहीत केलेल्या शिक्षण शुल्काची प्रतिपूर्ती शासनामार्फत करण्यास शासन निर्णय दिनांक २०/०९/२०१९ अन्वये **तत्वत:** मान्यता देण्यात आली आहे. सदर निर्णयास मंत्रिमंडळाची मंजुरी प्राप्त झाल्याने याव्दारे त्यास अंतिम मान्यता जाहीर करण्यात येत आहे.

२. उपरोक्त शासननिर्णयानुसार शैक्षणिक शिक्षण शुल्काच्या प्रतिपूर्तीसंदर्भातील पात्रतेसाठीचे निकष व शुल्क प्रतिपूर्तीबाबतची सविस्तर कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील:-

१) उपरोक्त शासननिर्णयानुसार शैक्षणिक शुल्काच्या प्रतिपुर्तीकरीता पात्र असणा-या विद्यार्थ्यांची अभ्यासक्रमनिहाय यादी संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत प्रवेशप्रक्रियेचे अभिलेख विचारात घेऊन तयार करण्यात येईल.

२) प्रवेशाच्या वेळेस विद्यार्थ्यांचे प्राप्त पसंतीक्रम विचारात घेऊन एसईबीसी/ ईडब्ल्युएस आरक्षण लागू झाले नसते तर ज्यांना शासकीय महाविद्यालयात प्रवेश प्राप्त झाला असता, परंतू सदर आरक्षण लागू झाल्यामुळे त्यांना खाजगी महाविद्यालयात प्रवेश घ्यावा लागला, अशाच विद्यार्थ्यांचा सदर प्रतिपुर्तीच्या यादीत समावेश होईल.

३) सदर यादी संचालनालयाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करुन यादीसंदर्भातील उचित हरकतींची तपासणी करण्यात येईल.

४) शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्तीही संबंधित अभ्यासक्रमाच्या किमान विहीत कालावधीकरिता (जसे की, एम.बी.बी.एस. - साडेचार वर्षे, बी.डी.एस.-चार वर्षे, पदव्युत्तर-तीन वर्षे) देय राहील.

५) संबंधित अभ्यासक्रमाच्या परीक्षेत अनुत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना प्रतिपूर्तीची रक्कम तो ज्या वर्षात अनुत्तीर्ण झाला आहे त्या वर्षाकरिता अनुज्ञेय राहणार नाही.

६) बाधीत विद्यार्थ्यांच्या शिक्षण शुल्काची प्रतिपूर्ती करतांना, सदर विद्यार्थी शासकीय वैद्यकीय/ दंत महाविद्यालयात प्रवेशित झाले असते तर त्यांना जे शिक्षण शुल्क भरावे लागले असते त्या शुल्काची रक्कम आणि त्यास अनुज्ञेय असणारी केंद्र/ राज्य शासन यांच्यामार्फत प्राप्त होणारी शिष्यवृत्तीची/ प्रतिपुर्तीची/ वित्तीय सहाय्याची रक्कम वजा करुन उर्वरित भरणा केलेल्या शुल्काची प्रतिपूर्ती करण्यात येईल.

७) अनिवासी भारतीय कोटा तसेच व्यवस्थापन कोटा/ संस्थात्मक कोटा यातून तसेच संस्थास्तरावर प्रवेशित झालेल्या विद्यार्थ्यांना सदर प्रतिपूर्ती अनुज्ञेय असणार नाही.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक -१३०/ व्यय-१३, दिनांक १४.०२.२०२० आणि नियोजन विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक - १३२९/ का.१४७५, दिनांक २९.०५.२०२० अनुसार व त्या विभागांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००९१२१५५८२५१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURENDRA PRALHAD CHANKAR

Digitally signed by SURENDRA PRALHAD CHANKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=da74ced4daa59e5121be348655e71412ea68827bae27cd8d480eb3963ff77726, cn=SURENDRA PRALHAD CHANKAR
Date: 2020.10.09 03:13:29 -07'00'

**(सुरेन्द्र प्र. चानकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

मा. राज्यपाल, यांचे प्रधान सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई.
मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
मा. राज्यमंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परिक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व सह सचिव/ उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व प्रमुख रुग्णालये, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
सर्व अधिष्ठाता, शासकीय/ महापालिका व खाजगी विनाअनुदानित वैद्यकीय/ दंत महाविद्यालये (संचालनालयामार्फत).
महालेखापाल -१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
महालेखाकार (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.
निवडनस्ती - कार्यासन “शिक्षण २”